रब्बी हंगाम सन २०२०-२१ साठी तालुका ते राज्य स्तरावरील पीकस्पर्धा विजेत्या शेतक-यांना बक्षिस रक्कम वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांक :-राअसुअ-२०२१/प्र.क्र.६५/४अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २० सप्टेंबर, २०२१

**संदर्भ:-**

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.पिकस्पर्धा-२०२०/प्र.क्र.४८/४-अे, दि.०५/१०/२०२०
२. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.वि.प्र.४/पीकस्पर्धा/निधी मागणी/२४८२९/२०२१, दि.०३/०८/२०२१

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये पिकाची उत्पादकता वाढविण्यासाठी विविध भागांमध्ये शेतक-यांकडून विविध प्रयोग करण्यात येतात व उत्पादकतेत वाढ करण्यात येते. अशा प्रयोगशील शेतक-यांना, मिळालेल्या उत्पादकतेबाबत प्रोत्साहन देऊन गौरव केल्यास त्यांची इच्छाशक्ती , मनोबल यांमध्ये वाढ होऊन आणखी उमेदीने नवनवीन अद्यावत तंत्रज्ञानाचा वापर केला जाईल. यामुळे कृषि उत्पादनामध्ये भर घालण्यासाठी शेतक-यांचे योगदान मिळेल. तसेच त्यांचे मार्गदर्शन परिसरातील इतर शेतक-यांना होऊन राज्याच्या एकूण उत्पादनात मोलाची भर पडेल, हा उद्देश ठेऊन राज्यांतर्गत पीकस्पर्धा योजना राबविण्यात येत आहे.

सद्यस्थितीत सदरच्या योजनेमध्ये शेतक-याला राज्यस्तरावरील सर्वोच्च पारितोषिक मिळविण्यासाठी स्वतःचे शेतात तीन वर्ष सातत्याने तेच पिक घ्यावे लागते, उत्पादकतेत सातत्य राखावे लागते, दुर्देवाने अवकाळी आपत्कालीन/ नैसर्गिक आपत्तीसारखी परिस्थिती उद्भवल्यास उत्पादकतेतील घट शेतक-यांना नाउमेद करते. एकुणतः या बाबी टाळण्यासाठी शेतक-यांना सहभागी होता यावे व एकाच वर्षात त्या पिकाच्या येणा-या उत्पादकतेवर स्पर्धेमध्ये सहभागी होता यावे, या उद्देशाने शेतक-यांची आलेली उत्पादकता आधारभूत घेऊन राज्य, विभाग, जिल्हा व तालुका स्तरावरील बक्षीसे देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

यानुषंगाने रब्बी हंगाम २०२०-२१ पासून सुधारित मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करून सर्वसाधारण व आदिवासी गटासाठी रब्बी ज्वारी, गहू, हरभरा, जवस, तीळ व करडई या ६ पिकांसाठी पीकस्पर्धा आयोजित करण्यात आल्या होत्या. तथापि, जवस व तीळ या २ पिकांसाठी स्पर्धक संख्या कमी असल्याने स्पर्धा झाल्या नाहीत. उर्वरीत रब्बी ज्वारी, गहू, हरभरा व करडई या चार पिकांसाठी राज्यामधुन एकुण ६०५३ स्पर्धक शेतक-यांनी सहभाग घेतला. त्यानुषंगाने सन २०२०-२१ च्या रब्बी हंगामाचा सर्वसाधारण व आदिवासी गटासाठीचा निकाल दि.२४/०६/२०२१ रोजी राज्यस्तरीय पिकस्पर्धा समितीमार्फत निकाल घोषित करण्यात आला.

राज्यातील सर्व स्पर्धकांतून पीक कापणीनंतर आलेली उत्पादकता आधारभूत घेऊन त्यातून राज्यस्तरावरील पिकनिहाय प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाचे पिकस्पर्धा विजेते निवडण्यात आले. राज्यस्तरावरील प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाचे पिकस्पर्धा विजेते वगळून, संबंधित विभागाच्या कार्यक्षेत्रातील स्पर्धकांमधून विभागस्तरावरील पिकनिहाय प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाचे पिकस्पर्धा

विजेत्यांची विभागीय कृषि सहसंचालक यांनी निवड करुन आयुक्तालयास नावे कळविली आहे. राज्य आणि विभागस्तरावरील प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाचे पिकस्पर्धा विजेते वगळून, संबंधित जिल्ह्याच्या कार्यक्षेत्रातील स्पर्धकांमधून जिल्हास्तरावरील पिकनिहाय प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाचे पिकस्पर्धा विजेत्यांची जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी निवड करुन करुन कृषि आयुक्तालयास नावे कळविली आहे. तसेच राज्य, विभाग आणि जिल्हास्तरावरील प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाचे पिकस्पर्धा विजेते वगळून, संबंधित तालुक्याच्या कार्यक्षेत्रातील स्पर्धकांमधून तालुकास्तरावरील प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाचे पिकस्पर्धा विजेत्यांची तालुका कृषि अधिकारी यांनी निवड करुन निकाल घोषित केले आहेत. सर्व स्तरावरील निकाल कृषि आयुक्तालयास प्राप्त झाले असून रब्बी हंगाम २०२०-२१ मधील पीकस्पर्धाचे निकाल विजेते संख्या व बक्षिस रक्कम घोषवारा खालील प्रमाणे आहे:

| पिकाचे नाव | राज्यस्तर | | विभागस्तर | | जिल्हास्तर | | तालुकास्तर | | एकूण | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | विजेते संख्या | बक्षिस रक्कम | विजेते संख्या | बक्षिस रक्कम | विजेते संख्या | बक्षिस रक्कम | विजेते संख्या | बक्षिस रक्कम | विजेते संख्या | बक्षिस रक्कम |
| रब्बी ज्वारी | ६ | २४०००० | १८ | ३६०००० | ४३ | ३१८००० | १६२ | ५४५००० | २२९ | १४६३००० |
| हरभरा | ६ | २४०००० | ४२ | ८४०००० | १३४ | ९८५००० | ६३८ | २१४४००० | ८२० | ४२०९००० |
| गहू | ६ | २४०००० | ३५ | ७०५००० | १०२ | ७५३००० | ३१६ | १०६६००० | ४५९ | २७६४००० |
| करडई | ३ | १२०००० | ३ | ६०००० | २ | १७००० | ० | ० | ८ | १९७००० |
| **एकूण** | **२१** | **८४००००** | **९८** | **१९६५०००** | **२८१** | **२०७३०००** | **१११६** | **३७५५०००** | **१५१६** | **८६३३०००** |

त्यानुषंगाने, पीक स्पर्धा रब्बी हंगाम २०२०-२१ मधिल विविध पातळीवरील विजेत्यांना बक्षिस रक्कम अदा करण्यासाठी रक्कम रु.८६.३३ लक्ष उपलब्ध करून देण्याची विनंती कृषी आयुक्तालयाने संदर्भ क्र. ०२ च्या पत्रान्वये केली आहे. सबब,पीक स्पर्धा रब्बी हंगाम २०२०-२१ मधिल विविध पातळीवरील विजेत्यांना बक्षिस रक्कम अदा करण्यासाठी रक्कम रु.८६.३३ लक्ष लाख वितरीत करणेबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णयः</u>**

१. सन २०२१-२२ करीता विविध कृषि पुरस्कार व पीक स्पर्धा विजेते शेतक-यांचा सत्कार अंतर्गत पीक स्पर्धा रब्बी हंगाम २०२०-२१ मधिल विविध पातळीवरील विजेत्यांना बक्षिस अदा करणेकरिता रु.८६.३३ लक्ष (रुपये शहाएंशी लाख तेहत्तीस हजार फक्त) निधीच्या वितरणास मान्यता देण्यात येत आहे.

२. परिच्छेद १-मध्ये नमूद केल्यानुसार विविध कृषि पुरस्कार व पीक स्पर्धा विजेते शेतक-यांचा सत्कार अंतर्गत पीक स्पर्धा रब्बी हंगाम २०२०-२१ मधिल विविध पातळीवरील विजेत्यांना बक्षिस अदा करणे करिता सदर निधी पुढील लेखाशिर्षाखालील अर्थसंकल्पीय तरतुदीतून खर्ची टाकावा:-

**२४०१- पीक संवर्धन**
**१०९- विस्तार व शेतकऱ्यांचे प्रशिक्षण**
**१०९(०१) (०३) पीक स्पर्धा**
**(२४०१ ०७५३) विविध कृषि पुरस्कार व पीक स्पर्धा विजेते शेतक-यांचा सत्कार**

३. सन राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण आधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

४. सदर शासन निर्णयान्वये पीक स्पर्धा रब्बी हंगाम २०२०-२१ मधिल विविध पातळीवरील विजेत्यांना बक्षिस अदा करणेकरिता उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या रु.८६.३३ लक्ष रक्कमेचे जिल्हा निहाय/ कार्यालय निहाय वाटप करण्याकरिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी अभियानांतर्गत जिल्हा निहाय वाटप करावयाचा निधी PFMS प्रणालीद्वारे सर्व संबंधित जिल्हयांना वितरीत करावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६ एप्रिल, २०२१ व दि.२४ जुन, २०२१ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त व नियोजन विभागाच्या अनौचारिक संदर्भ क्र. अनुक्रमे २६४/ २०२१/ व्यय-०१, दिनांक-२७.०८.२०२१ व २६८/१४३१, दिनांक-०६.०८.२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२०१५३४००७४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने**

MAHAVEER BALASAHEB ZENDAGE

Digitally signed by MAHAVEER BALASAHEB ZENDAGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRI AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9503a5209c984c11d292912b642bdfd32282e4276fb5541f4f92f23cb110d23, pseudonym=37B01588C0BB093738788C0382DB2C2FAD747357, serialNumber=43D7BB272129CD13828532684B1CB2CEEE1F236D393ACECB71084BC36FFEED02, cn=MAHAVEER BALASAHEB ZENDAGE
Date: 2021.09.20 15:38:17 +05'30'

**(महावीर झेंडगे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मंत्री (कृषि)यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.

२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.

३. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानसभा ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई

४. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानपरिषद ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई

५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग ,मंत्रालय, मुंबई

८. सचिव (कृषि) ,कृषि व पदुम विभाग ,मंत्रालय, मुंबई.

९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१०.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.

११.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.

१२.सर्व विभागीय कृषी सहसंचालक

१३.सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी

१४.महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.

१५.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर

१६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर

१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य

१८. सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे

१९.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई

२०.निवड नस्ती-४अे